१४ :

# वेडा

लेखक—

खलील जिब्रान.

अनुवादक—

श्रीपाद जोशी

प्रस्तावना—

श्री काका कालेलकर

मूल्य १॥ रुपया.

## वेडें शहाणपण

जगण्यासाठीं माणसाने अनेक विद्या व कला आपल्याशा केल्या. शेती, बागाईत, पशुसंवर्धन, वस्त्रनिर्माण, गृहनिर्माण इत्यादि प्राथमिक कला आणि त्याना आवश्यक अशा विद्या त्यानें वढविल्या तऱ्हेतऱ्हेचीं उपकरणें, अवजारें ( आउतें ) आणि शस्त्रें त्यानें घडविलीं. यामुळे त्याचें सामर्थ्य वाढलें पण जीवनात समाधान मिळविण्याची गुरुकिल्ली त्याच्या हातीं लागेना. जगावें कशासाठीं आणि जीवनाकडे पहावें कोणत्या दृष्टीने याची खरी खोटी कल्पना स्पष्ट झाल्यावाचून माणसाला समाधान वाटेना. हें समाधान मिळविण्यासाठी माणसानें निरनिराळे धर्म काढले. इहलोकाचा अर्थ लावण्या-साठीं आणि ऐहिक जीवनातील उणीवा भरून काढण्यासाठीं

त्यानें परलोक तयार केला आणि तो खराखुरा वाटावा म्हणून परलोकाचा इतिहास-भूगालहि त्याने रचला. अशा रीतीनें धार्मिक साहित्य समृद्ध झालें.

पण भिन्नधर्मी लोक एकत्र आल्यानतर कुणाचा धर्म खरा आणि कुणाचा खोटा याविषयीं वादविवाद आणि मारामाऱ्या सुरू झाल्या. हरलेल्या लोकाचे देव विजयी लोकाच्या देवाचे माडलिक बनले. पण धर्मातून मिळणारें जुनें समाधान जे नष्ट झालें तें झाले.

यानंतर बुद्धीच्या आश्रयाने मजबूत झालेली निरनिराळीं दर्शनें, तत्त्वज्ञाने पुढें सरसावलीं आणि जीवनाला समाधान मिळवून देण्याचा प्रयत्न करू लागलीं. पण तेथेंहि निरनिराळ्या दर्शनांची एकवाक्यता होईना. वाद वाढला, शास्त्रार्थ माजला आणि जीवन कटाळलें.

कधीं कधीं धर्म आणि तत्त्वज्ञान याच्या सर्व प्रयत्नात भाग घेणारे आणि कधीं कधीं तटस्थपणें गंमत पहात बसणारे कवी निराळ्या रीतीनें विचार करू लागले. कवींनीं पाहिलें कीं, शास्त्रग्रथाचें, विधिनिषेधाचें आणि तर्ककर्कशतेचें बंधन जीवनाला मानवत नाहीं. जीवन नदीसारखें वाहात असतें. त्याला ओळखावें, त्याला नटवावें, त्याला वाटल्यास रगवावें देखील; पण बंधनात मात्र त्याला कधीं घालू नये.

धर्म म्हणेल कीं, हे कवी नास्तिक आहेत, तर्क म्हणेल कीं, या कवींच्या वचनात एकवाक्यता नसतें. संगतिहि नसते. कवी म्हणतील कीं, 'अहो, आम्हीं

वेडे आहोंत. आम्ही तुमच्या दुनियेचे रहिवासी कोठें अहोंत कीं, आम्हाला तुमचे नियम लागू व्हावेत ? आमची दृष्टी तुमच्या डोळसपणाच्या पलीकडे गेलेली असते आणि म्हणून तुम्हाला जे दिसत नाहीं ते आम्हाला दिसतें; तुम्हाला जें समजत नाहीं तें आम्हाला समजतें. तुम्ही आमच्या वाटेला जाऊ नका. पण तेंहि तुम्हाला साधावयाचें नहीं. तुम्ही आमचेजवळ येणार, आमचें म्हणणें ऐकून अस्वस्थ होणार आणि तुमच्या शहाणपणातून तुम्हीं मुक्त झाला म्हणजे तुम्हाला आमची विसगत वाणी पटणार. धर्मदृष्टि व तर्कदृष्टि ज्यानीं मोडून दिली त्यानाच आमची जीवनदृष्टि लाभणार. व्यवहारदृष्टीनें आम्ही वेडेच आहोत. "

रवीन्द्रनाथांनीं स्वतःच्या अनेक नाटकातील आपल्या आवडत्या पात्राना वेडयाचे किंवा बावळयाचें रूप दिलें आहे आणि आपले जीवनाविषयक खोल विचार त्याच्या तोंडून वदविले आहेत आणि पुन्हा ते निक्षून सागतात कीं, ' हीं वचनें ऐका; काहीं समजलें तर पहा, पण तुमच्या पाया पडतों; या वचनाचा अर्थ किंवा त्याचें रहस्य मला विचारू नका. '

आर्मीनिया देशातील लेबेनॉन या गावीं जन्मलेला एक अरबी वेडा खलील जिब्रान इजिप्त, फ्रान्स, अमेरिका वगैरे देशात गेला. तेथें उत्तम शिकला पण मोठया शर्तीनें वेडाचा वेडाच राहिला आणि त्यानें अरबीप्रमाणें इग्रजी भाषेच्या द्वारेंदेखील पुष्कळाना वेड लावलें. त्याने इग्रजी भाषेंत प्रवेश केला तोच ' वेडा ' या सदराखालीं !

अशा या वेड्याचें जीवनदर्शन मराठीला यापूर्वीच लाभलें आहे. या वेड्याचा महाराष्ट्राला मी प्रथम परिचय करून दिला. ' विहगम ' मासिकाच्या द्वारा १९३६-३७ सालीं पण खलील जिब्रानचे ते वेड पुस्तकरूपानें प्रकाशित करण्याचें राहूनच गेले. त्यानंतर त्याचीं आणखी दोन-तीन पुस्तके मी मराठींत आणली पण तीहि अशींच पडून राहली आहेत.

श्री. श्रीपाद जोशींनीं जिब्रानचे पहिले वेड आपल्या मतें मराठींत आणून प्रकाशित करण्याचे ठरविले आणि माझ्या-कडे प्रस्तावना मागितली. माझें भाषांतर मराठींत आले असताना स्वतःचे भाषांतर प्रकाशित करावे किंवा नाहीं अशी शंका त्यांना वाटली. मी म्हणलों, " वेड्यांना पुढे सरसावण्याचा हक्क नेहमींच असतो ! " त्यांनीं माझ्याकडे एक वेडी मागणी केली कीं, ' माझे भाषांतर सुधारून द्या ! ' त्यांच्या एवढेंहि लक्षात आले नाही की, त्यांचे भाषांतर सुधारण्याइतका वेळ किंवा उत्साह मजजवळ असता तर मी 'विहगम'तील माझेंच भाषांतर ठीकठाक करून यापूर्वींच छापलें नसते काय ?

आणि कोणा भाषांतरकाराला स्वतःचे सोडून दुसऱ्याचे भाषांतर आवडणार ? मी त्याचें भाषांतर सुधारण्यास घेतलें असतें तर सुधारतां सुधारतां त्याला माझ्या भाषांतराचेंच रूप दिलें असतें-**'आपुल्या सारिखें करिती तात्काळ'**-अडचण इतकीच कीं, फार कामात असल्यामुळे—' नाहीं काळ वेळ तयापाशीं ! '

जगातील श्रेष्ठ कृतींची जितकीं अधिक भाषांतरें होतील ततेंक चांगलेच आहे. मौलिक पण गचाळ अशी भाराभर पुस्तकें प्रकाशित होण्यापेक्षा विश्वमान्य साहित्य कृतींचीं अनेक भाषांतरें झालीं तर तें इष्टच आहे. शर्त एवढीच कीं, श्रेष्ठ साहित्यकृती जितक्या समर्थ असतात तितक्याच नाजुक आणि कोमल असतात. त्यांना अन्याय होता कामा नये. पण या बाबतीत बंधूबंधूंची शिफारस कामाची नाहीं. वाचकानीच तें पाहून घ्यावें.

नवी दिल्ली,
गुरुद्वादशी — काका कालेलकर.
७—११—१९५०

## प्रयोजन

मराठीमध्यें आतापर्यंत खलील जिब्रानच्या Madman या पुस्तकाचीं दोन भाषातरें प्रकाशित झालीं आहेत. एक सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. स. खाडेकर यानीं 'सुवर्णकण' या नावाने केलेलें आणि दुसरें माझे मित्र श्री. रा. वा. चिटणीस यानीं 'चक्रम' या नावाने केलेलें. असे असता त्याच पुस्तकाचें हें तिसरे भाषातर प्रसिद्ध करण्याचें प्रयोजन काय याचा खुलासा करणें आवश्यक आहे असें मला वाटतें.

श्री. भाऊसाहेब खाडेकर यानीं केलेलें भाषातर पुष्कळच स्वैर अथवा मुक्त आहे आणि त्यांनीं जिब्रानच्या रूपक-कथाबरोबर त्यावरील स्वतःचें भाष्यहि सोबत जोडलेलें आहे. काहीं जिब्रान-भक्ताना असें वाटतें कीं जिब्रान इंग्रजींत अथवा अरबींत जसा आहे तसाच

मराठींत आणला जावा, त्यावर आपापल्या कल्पनेप्रमाण भाष्य करण्याचें स्वातंत्र्य प्रत्येकाला असावें. माझें स्वतःचें मनहि असेंच असल्यामुळें जिब्रानच्या कृतीचें भाषांतर करिताना मी कमींत कमी स्वातंत्र्य घेतों आणि थोडीशी क्लिष्टता आली तरी चालेल परंतु मुळाशीं जास्तींत जास्त प्रामाणिक राहावें असा माझा प्रयत्न असतो. यामुळें काहीं टीकाकार माझ्यावर अशी टीका करतात कीं ' एखाद्या धर्म-ग्रंथाचें भाषांतर करावें अशा पद्धतीनें तुम्ही जिब्रानचें भाषांतर करता ' आणि त्यांची टीका खरीच असल्यामुळें मी त्याबद्दल तक्रार करीत नाहीं जिब्रानचीं भाषांतरें जास्तींत जास्त मुळाला धरून व्हावींत अशी इच्छा असल्यामुळेंच मी हें तिसरें भाषांतर वाचकांपुढें ठेवीत आहें.

श्री. रा. वा. चिटणीस यांचे ' चक्रम ' हें भाषांतर Madman च्या हिन्दी भाषांतरावरून केलेलें आहे. तें हिन्दी भाषांतरहि श्री. भाऊसाहेबांच्या भाषांतराप्रमाणें पुष्कळसें स्वैर असल्यामुळें ' चक्रम ' आणि ' मॅडमन ' यांच्यात बराच फरक पडला आहे.

अर्थात् माझ्या आधीं अनेक भाषांतरें झालेलीं असल्या-मुळें मला त्यांचा उपयोग करून घेता आला. ' सुवर्णकण ' व ' चक्रम ' हीं मराठी भाषांतरें, चौधरी शिवनाथसिंह शांडिल्य यांचें ' पागल ' हें हिन्दी भाषांतर आणि सैय्यद बशीर हिन्दी यांचें ' पागल ' याच नांवाचें उर्दू भाषांतर अशीं चार पुस्तकें भाषांतर करताना माझ्या हाताशीं होतीं.

व त्याचा मीं भरपूर उपयोग करून घेतला आहे. त्याबद्दल या चारहि भाषांतरकाराचा मी आभारी आहें.

इतके करूनाहि हें भाषांतर ‘पूर्ण’ झालें आहे असा माझा मुळींच दावा नाहीं. काहीं सूक्ष्म छटा अजूनहि येऊ शकलेल्या नाहींत याची मला जाणीव आहे. परंतु माझ्या-कडून मी शक्य तितकी खटपट केली आहे आचार्य काकासाहेब कालेलकर यांनीं माझें भाषांतर सुधारून द्यावे अशी माझी इच्छा होती. परंतु त्यांतील अडचण त्यावेळीं माझ्या लक्षात आली नाहीं. त्यासंबंधी आचार्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत खुलासा केलाच आहे.

बाजारात दोन भाषांतरें असतांहि तिसरे भाषांतर प्रसिद्ध करण्याचें धाडस दाखविल्याबद्दल माझे मित्र श्री. पा. रा. ढमढेरे याचे अभिनंदनच केलें पाहिजे.

६०५ नारायण,
पुणें २.
दीपावली १९५०

—श्रीपाद जोशी.

## मी वेडा कसा झालों ?

तुम्ही मला विचारता की 'तू वेडा कसा झालास?' त्याचें असें झालें:—

अजून पुष्कळसे देव जन्मालाहि आले नव्हते. अशा वेळीं एके दिवशीं मी गाढ झोपेंतून जागा झालों आणि मी आपल्या सात जन्मामध्यें तयार केलेले व वापरलेले माझे मुखवटे चोरीस गेल्याचें मला आढळून आलें. त्याबरोबर 'चोर, चोर, नीच चोर!' असें ओरडत मी मुखवट्यांशिवायच रस्त्यांतून धावू लागलों.

पुरुष आणि स्त्रिया मला हंसू लागल्या व त्यांच्यापैकीं काहींजण मला घाबरून आपापल्या घरांकडे धावले.

मी भर बाजारात जाऊन पोंचलों तेव्हा घराच्या गच्चींत उभा असलेला एक तरुण ओरडून म्हणाला, 'हा वेडा आहे वेडा!' त्याच्याकडे पाहाण्यासाठीं मीं दृष्टि वर केली आणि सूर्यानें पहिल्यांदांच माझ्या अनावृत चेहऱ्याचें चुंबन घेतलें. सूर्यानें प्रथमच माझ्या उघड्या चेहऱ्याचें चुंबन घेतलें आणि माझा आत्मा सूर्याच्या प्रेमानें उद्दीप्त झाला. आता मला आपल्या मुखवट्यांची गरज उरली नाही आणि अचानकपणें भानावर आल्या-सारखा मी ओरडलों, "भल होवो! ज्यानी माझे मुख वटे चोरून नेले त्या चोराच भलं होवो!"

अशा प्रकारें मी वेडा झालों.

आणि या वेडेपणामध्यें मला स्वातंत्र्य नि सुरक्षितता दोन्हीं प्राप्त झालीं आहेत—हो, एकाकीपणाचें स्वातंत्र्य आणि लोकांच्या मनांत माझ्यासबंधीं असलेल्या अज्ञानाचें संरक्षण, कारण जे लोक आम्हांला ओळखतात ते आम-च्यांतील कांहीं ना कांहीं अशाला गुलामच बनवितात.

परतु मला माझ्या सुरक्षितपणाबद्दल फार गर्व करता कामा नये. तुरुंगामध्यें एक चोर दुसऱ्या चोरापासून सुरक्षितच असतो.

## ईश्वर

अगदीं प्राचीन काळीं जेव्हां पहिल्यांदाच माझे ओंठ बोलण्यासाठीं हलले तेव्हां मी पवित्र पर्वतावर चढून ईश्वराला म्हणालों, "प्रभो मी तुझा दास आहें. तुझी अव्यक्त इच्छा ही मला कायद्यासमान आहे. मी सदैव तुझ्या आज्ञेंत राहीन."

परंतु ईश्वरानें कांहींच उत्तर दिलें नाही आणि एखाद्या प्रचंड झंझावाताप्रमाणें तो निघून गेला.

एक हजार वर्षानंतर मी पुन्हां त्या पवित्र पर्वतावर चढलों आणि ईश्वराला म्हणालों, "हे विधात्या, मी

तुझी सृष्टि आहें. तूं मला मातींतून निर्माण केलें आहेस. व मजजवळ जें कांहीं आहे तें सर्व तुझ्यामुळेंच आहे."

परंतु ईश्वरानें कांहींच उत्तर दिलें नाहीं आणि हजारों वेगवान पंख असलेल्या एखाद्या पक्ष्याप्रमाणें तो झरीदिशीं निघून गेला.

पुन्हां एक हजार वर्षानंतर मी त्या पवित्र पर्वतावर चढून ईश्वराला म्हणालों, "परमपित्या, मी तुझा पुत्र आहें. दया आणि प्रेम यांनीं भारावून तूं मला जन्म दिला आहेस आणि प्रीति नि भक्ति यांच्या द्वारेंच मी तुझ्या साम्राज्याचा उत्तराधिकारी बनीन."

तरीहि ईश्वरानें कांही उत्तर दिलें नाही आणि दूर-वरच्या टकड्यांना आच्छादून टाकणाऱ्या धुक्याप्रमाणें तो निघून गेला.

पुन्हां एक हजार वर्षांनीं मी त्या पवित्र पर्वतावर चढलों आणि परमेश्वराला उद्देशून म्हणालों, "माझ्या ईश्वरा, तूच माझें उद्दिष्ट आहेस आणि तूच त्याचें साफल्यहि आहेस. मी तुझा भूतकाळ (काल) आहें. आणि तूं माझा भविष्यकाळ (उद्यां) आहेस. मी तुझें मातींतील मूळ आहें. आणि तू माझे आकाशातील फूल आहेस. व आपण दोघेहि सूर्यप्रकाशात बरोबरच विकसित होत आहोंत."

त्याबरोबर ईश्वर माझ्या शरीरावर वांकला आणि माझ्या कानांत मधुर शब्द कुजबुजला. मग आपल्याकडे धांव घेणाऱ्या ओहोळाला समुद्र ज्याप्रमाणें आपल्या मिठींत घेतो त्याप्रमाणें त्यानें मला कवटाळून घेतले.

आणि जेव्हां मी पर्वतावरून खालीं उतरलों व मैदानांत आणि दऱ्याखोऱ्यांत आलों तेव्हां तेथेंहि ईश्वर असल्याचें मला आढळून आलें.

## माझ्या मित्रा !

माझ्या मित्रा, मी जसा दिसतो तसा मुळींच नाही. माझें बाह्य स्वरूप म्हणजे निव्वळ मीं परिधान केलेलें एक वस्त्र आहे. हें वस्त्र मोठ्या काळजीपूर्वक विणण्यात आलेलें आहे. तें तुझ्या प्रश्नांपासून माझें आणि माझ्या उपेक्षेपासून तुझें रक्षण करतें.

माझ्या मित्रा, माझ्यातील ह्या 'मी' मौनाच्या घरात निवास करतो आणि यापुढेंहि नेहमीं तो तेथेंच राहणार. त्याला कोणीहि पाहूं शकणार नाहीं अथवा त्याच्यापर्यंत कोणी पोहोचूं शकणार नाहीं,

मी जें कांहीं सांगेन तें तूं खरें मान अथवा मी जें कांहीं करीन त्यावर तूं विश्वास ठेव असें मी म्हणत

नाहीं. कारण माझे शब्द हे माझे नसून ते तुझ्याच विचाराचे प्रतिध्वनी आहेत आणि माझीं कृत्यें म्हणजे कृतींत उतरलेल्या तुझ्याच आशा आहेत.

जेव्हां तूं असें म्हणतोस कीं, ‘ वारा पूर्वेकडे वाहात आहे. ’ तेव्हा मी म्हणतों, ‘ होय, तो पूर्व दिशेलाच वाहात आहे. ’ कारण त्यावेळी माझें मन वाऱ्यात गुंत-लेलें नसून समुद्रात गुंतलेलें आहे हें तुला कळावें अशी माझी इच्छा नसते.

माझे समुद्रप्रवासी विचार तुला कळणार नाहीत किंवा मी तुला ते कळूंहि देणार नाहीं, कारण समुद्रावर आपण एकट्यानेंच असावे असें मला वाटते.

माझ्या मित्रा, जेव्हां तुझा दिवस असतो तेव्हा माझी रात्र असते आणि तरीहि त्यावेळी मी टेकड्यांवर नृत्य करणाऱ्या भरदुपारच्या सोनेरी किरणासंबंधीं आणि दरीवरून हळू हळू जाणाऱ्या जांभळ्या सावलीसंबंधीं बोलत असतों. कारण तू माझी अंधाराची गाणी ऐकूं शकत नाहीस किंवा ताऱ्यासमोर फडफडणारे माझे पखहि तुला दिसू शकत नाहींत. तुला तीं गाणी ऐकू न यावीत व ते पख न दिसावेत यातच मला आनंद

आहे, कारण रात्रीच्यासमवेत आपण एकट्यानेंच असावे असें मला वाटतें.

जेव्हा तूं आपल्या स्वर्गाकडे उड्डाण करतोस तेव्हा मी माझ्या नरकामध्यें उतरतों. त्यावेळीं देखील तू मला दुर्लंघ्य अशा आखाताच्या पैलतीरावरून 'माझ्या मित्रा! माझ्या दोस्ता!' असें म्हणून हांक मारतोस व मीहि 'माझ्या दोस्ता! माझ्या मित्रा!' असें म्हणून तुझ्या सादेला प्रतिसाद घालतों—कारण तूं माझा नरक पहावास असें मला वाटत नाहीं, कारण तेथील ज्वाळा तुझी दृष्टि जाळून टाकील आणि तेथील धुरांनीं तुझ्या नाकपुड्या भरून जातील. शिवाय माझ्या नरकाबद्दल मला इतकें प्रेम वाटतें कीं, तूं तेथें यावेंस हें मला आवडत नाहीं. नरकामध्येंहि आपण एकट्यानेच असावें असें मला वाटतें.

सत्य, सौंदर्य आणि साधुत्व यांवर तूं प्रेम करतोस आणि तुझ्याखातर मीहि असें म्हणतों कीं, या गोष्टींवर प्रेम करणें योग्य व सुंदर आहे. परंतु हृदयातून मात्र मी तुझ्या या प्रेमाला हसत असतों. तरीपण माझें हंसूं तुला दिसावें असें मला वाटत नाहीं. कारण आपण एकट्यानेंच हंसावें असें मला वाटतें.

माझ्या मित्रा, तू चांगला आहेस, सावध आहेस आणि शहाणा आहेस. नव्हे, तूं परिपूर्ण आहेस—आणि मी देखील तुझ्याशीं शहाणपणानें व सावधगिरीनें बोलत असतों. तरीहि मी एक वेडा आहें. मी माझ्या वेडावर पांघरूण घालतों, कारण आपण एकट्यानेंच वेडें असावें असें मला वाटतें.

माझ्या मित्रा, वस्तुतः तू माझा मित्र नाहींस. पण हें मी तुला कसें समजावून देऊं? माझा मार्ग हा तुझा मार्ग नव्हे, आणि तरीहि आपण हातांत हात घालून बरोबरीनें चालतों.

## बुजगावणें

एकदा एका बुजगबाहुल्याला मी म्हणालों, "या निर्जन शेतात उभें राहण्याचा तुला अगदी कटाळा येऊन गेला असेल नाही!"

तें म्हणालें, "इतरांना भिवविण्यांतील आनद इतका मोठा आणि चिरकाल टिकणारा असतो की, त्याचा मला कधींच कटाळा येत नाहीं."

मी एक क्षणभर विचार करून म्हणालों, "खरें आहे तुझें म्हणणें, कारण मीहि त्या आनदाचा अनुभव घेतला आहे."

बुजगावणें म्हणालें, "ज्यांच्या शरीरांत पेंढा भरलेला असेल त्यानाच हा आनंद कळूं शकेल."

हें ऐकून मी त्याचा निरोप घेतला. त्यानें माझी स्तुति केली कीं टर उडविली हेंच मला कळलें नाहीं.

एक वर्ष निघून गेलें. या अवधींत त्या बुजगावण्याचें एका तत्त्वज्ञान्यात रूपांतर झालें होतें.

आणि जेव्हा मी पुन्हा त्याच्याजवळून जाऊं लागलों तेव्हा त्याच्या टोपीखाली दोन कावळे घरटें बांधीत असलेले मला दिसले.

## स्वप्नचर

ज्या गावात माझा जन्म झाला, त्याच गांवांत एक बाई आणि तिची मुलगी राहात असे. त्या दोघींनाहि झोपेंत चालण्याची संवय होती.

एके दिवशीं रात्रीं साऱ्या जगावर निःस्तब्धता पसरली असतां या मायलेकी झोपेंत चालूं लागल्या. धुक्यानें भरलेल्या त्यांच्या बागेंत त्यांची गाठ पडली.

तेव्हां आई मुलीला उद्देशून म्हणाली, "कळलं! कळलं मला सारं! माझी वैरीण तूंच आहेस. तूं माझ्या तारुण्याचा नाश केलास. माझ्या जीवनाच्या भग्नावशेषांवर तूं आपलें जीवन उभारलें आहेस. मी तुला ठार मारून टाकूं शकलें असतें तर किती छान झालें असतें!"

यावर ती मुलगी उत्तरली. "अगे तिरस्करणीय निस्वार्थी थेरडे! मी आणि माझा स्वतंत्र आत्मा यामध्यें तूं घोंड बनून राहिली आहेस. माझें जीवन हा आपल्या विटलेल्या जीवनाचाच प्रतिध्वनि व्हावा असें तुला वाटतें. तू मरशील तर किती बरें होईल!"

याच क्षणीं एक कोंबडा आरवला आणि दोघीजणी जाग्या झाल्या. आईनें हळूंच विचारलें, "तूंच कां ती माझ्या लाडक्या बाळे?" ती मुलगी मृदु स्वरांत उत्तरली, "होय आई, मीच ती!"

## शहाणा कुत्रा

एके दिवशीं माजरांच्या एका कळपाजवळून एक शहाणा कुत्रा चालला होता.

तो त्यांच्या नजदीक जाऊन पोंचल्यानंतर त्याला असें दिसून आलें कीं, मांजरें आपल्याच नादांत गुंग आहेत आणि त्यांचें आपल्याकडे मुळींच लक्ष नाहीं. तेव्हा तो तेथें थाबला.

इतक्यात त्या माजरांच्या थव्यातून एक भला मोठा, गभीर चेहऱ्याचा बोका उठला आणि सर्वांवर दृष्टिक्षेप करून म्हणाला, "बंधु-भगिनींनों! प्रार्थना करा. कारण तुम्हीं श्रद्धायुक्त अंत:करणानें पुनः पुनः ईश्वराची प्रार्थना कराल तर खात्रीनें आकाशातून उंदरांचा पाऊस पडेल!"

हें ऐकून कुत्रा मनातल्या मनांत हसला व त्याच्या-कडे पाठ वळवून असें म्हणत तेथून निघून गेला. ‘अरे आंधळ्या नि मूर्ख मांजरांनो ! प्रार्थना, श्रद्धा नि विनंति याच्या योगें देव जो पाऊस पाडतो तो उंदरांचा नसून हाडकांचा असतो असें ग्रंथातरीं लिहून ठेवलेलें नाहीं काय ? आणि मला नि माझ्या पूर्वजांना ही गोष्ट माहित नाही काय ? ”

## दोन संन्यासी

एका निर्जन पर्वतावर दोन सन्यासी राहात असत. ते देवाची उपासना करीत आणि एकमेकांवर प्रेम करीत.

या दोन संन्याशांजवळ एक मातीचें भिक्षापात्र होतें. त्यांच्या मालकीची अशी ती एकच वस्तु होती.

एके दिवशीं त्याच्यापैकीं वयानें मोठा असलेल्या संन्याशाच्या मनात कलीनें संचार केला. तो धाकट्या संन्याशाकडे येवून म्हणाला, "आपण एकत्र राहू लागल्याला बरेच दिवस होऊन गेले. आता आपण विभक्त होण्याची वेळ आली आहे. तेव्हां आपण आपल्या संपत्तीची वांटणी करून घेऊं या."

हें ऐकून त्या तरुण संन्याशाला फार दुःख झालें आणि तो म्हणाला, "भाई, तू मला सोडून जावेंस याचें मला अत्यंत दुःख होतें; पण जर तुला जाणेंच भाग असेल तर ठीक आहे." असें म्हणून त्यानें तें मातीचें भिक्षापात्र आणलें व तें थोरल्या सन्याशाला देत तो बोलला, "भाई, आपल्याला या भांड्याची वांटणी करतां येणार नाहीं. तेव्हां तूंच हें घे.

यावर तो वडील संन्यासी म्हणाला, "मला कुणा-कडूनहि दान घ्यावयाचें नाही. जेवढें माझ्या स्वतःच्या मालकीचें असेल तेवढेंच मी घेईन. म्हणून या भिक्षा-पात्राची वाटणी झालीच पाहिजे."

लहान सन्यासी म्हणाला, "हें मातीचें भांडें फुट-ल्यास त्याचा तुला तरी काय उपयोग अथवा मला तरी काय उपयोग? तुला मान्य असेल तर आपण चिठ्या टाकून याचा निर्णय करूं."

पण तो मोठा सन्यासी पुन्हा म्हणाला, "मला फक्त न्याय हवा आहे आणि जे माझ्या हक्काचें असेल तेवढेंच मी घेईन. निरर्थक योगायोगावर न्याय नि माझा मालकी हक्क सोंपवून देण्यास मी तयार नाहीं. या भिक्षापात्राची विभागणी झालीच पाहिजे."

यावर त्या तरुण संन्याशाला त्याच्याशीं अधिक युक्तिवाद करतां येईना; म्हणून तो म्हणाला, " खरोखर तुझी अशीच इच्छा असेल आणि इतकें करूनहि तुला हें हवें असेल तर चल, आपण आता हें भिक्षापात्र फोडून त्याचे दोन भाग करूं. "

हें ऐकून थोरल्या सन्याशाचा चेहरा काळा ठिक्कर पडला आणि तो ओरडून म्हणाला, " अरे नीच भ्याडा ! एकूण तू कांहीं भांडायला तयार होणार नाहींस. "

## देवाण - घेवाण

एके काळीं एका माणसाजवळ इतक्या सुया होत्या कीं, त्याच्या योगें एक भली मोठी दरी भरून गेली असती.

एके दिवशीं येशु ख्रिस्ताची आई त्या इसमाकडे आली आणि म्हणाली, "मित्रा, माझ्या मुलाचा अंगरखा फाटला आहे आणि तो देवळांत जाण्यापूर्वीं मला तो शिवून ठेवला पाहिजे, तेव्हां तूं मला एक सुई देशील काय?"

त्यानें तिला सुई दिली नाहीं पण 'देवाण घेवाण' या विषयावर एक विद्वत्तापूर्ण प्रवचन मात्र त्यानें तिला सुनावलें आणि म्हटलें, "तुझा मुलगा देवळांत जाण्या-पूर्वीं त्याला हें व्याख्यान तू ऐकव."

## सात आत्मे

रात्रीच्या अत्यंत निवात वेळीं मी अर्धवट झोपेंत पडलों असता माझे सात आत्मे एकत्र बसले आणि पुढीलप्रमाणें आपापसांत कुजबुजत बोलू लागले.

**पहिला आत्मा**—इथें या वेड्याच्या शरीरात मी इतकी वर्षें राहिलों आहें. या अवधीत दिवसा त्याच्या वेदना ताज्या करावयाच्या आणि रात्रीं त्याचें दुःख पुन्हा उत्पन्न करावयाचें याखेरीज मी दुसरें कांहींच केलें नाही. ही रोजरोजची कटकट मला अगदी असह्य झाली आहे आणि आतां मी बंड करणार !

**दुसरा आत्मा**—माझ्यापेक्षा तुझें नशीब कितीतरी चांगलें आहे, भाऊ ! कारण या वेड्याचा आनंदी आत्मा

बनण्याची कामगिरी माझ्यावर सोंपविण्यांत आलेली आहे. मी त्याचें हसू हंसतों नि त्याच्या सुखाच्या क्षणी गाणीं गातों आणि त्याच्या उज्ज्वल विचारांबरोबर पायाना तीन तीन पख लावून मी नाचतों. आपल्या या कंटाळवाण्या जिण्याविरुद्ध खरोखर मलाच बंड केलें पाहिजे

**तिसरा आत्मा**—अन् माझें काय? मी प्रेमाच्या पाशानी बद्ध झालेला आत्मा आहें मी तर मोकाट सुटलेल्या वासना नि तऱ्हेवाईक इच्छा याचा जळता निखारा आहें. या वेड्याविरुद्ध मीच—हा प्रणय—पकात रुतलेला आत्माच—बंड करणार!

**चौथा आत्मा**—तुम्हा सर्वांमध्यें मीच अधिक दुःखी—कष्टी नि दुर्दैवी आहें. कारण हिडीस, द्वेष आणि विनाशक किळस याखेरीज मला कांहींच देण्यांत आलेलें नाही. मी वादळासारखा आत्मा आहे. नरकाच्या काळोख्या भुयारांत माझा जन्म झालेला आहे. या वेड्याची सेवा—चाकरी करण्याविरुद्ध मीच कंबर कसणार!

**पांचवा आत्मा**—छेः छेः! तुझ्या ऐवजी मीच बंड करणार! मी विचार करणारा, कल्पनेच्या साम्राज्यांत विहार करणारा आणि भूक नि तहान यांचा आत्मा आहें. अज्ञात वस्तूंचा नि अद्यापि निर्माणहि न

झालेल्या गोष्टींचा शोध करण्यासाठीं अविश्रांतपणें भटकत राहणें हेंच माझ्या नशिबीं लिहिलेलें आहे. म्हणून मीच बंड करणार !

**सहावा आत्मा**– आणि मी कामकरी आत्मा ! कुणालाहि माझी कींव यावी इतके काबाडकष्ट मी करीत असतों. सोशिक हातांनीं आणि आशाळभूत डोळ्यांनीं मी दिवसांच्या प्रतिमा बनवितों आणि निराकार तत्त्वाना नूतन नि शाश्वत आकार देतों. या अविश्रांत श्रमणाच्या वेड्याविरुद्ध मी एकलकोंडाच बंड करणार !

**सातवा आत्मा**– तुमच्यापैकीं प्रत्येकाला पूर्व-नियोजित काम करावें लागतें एवढ्याचसाठीं तुम्ही सगळ्यांनीं या माणसाविरुद्ध बंड करून उठावें ही किती चमत्कारिक गोष्ट आहे ! तुमच्याप्रमाणें मलाहि एक निश्चित दैव असलेला आत्मा होता आलें असतें तर किती चागलें झालें असतें ! पण माझ्या नशीबात काहीच काम लिहिलेलें नाहीं. मी एक निरुद्योगी आत्मा आहें तुम्ही जीवनाची पुनर्निर्मिति करण्यांत गढून गेलेले असतांना मीं मात्र दिक्कालशून्य अशा एका मूक पोकळीमध्यें गप्प बसलेला असतों तेव्हां माझ्या शेजाऱ्यानों ! तुम्हीच विचार करा, तुम्हीं बंड केलें पाहिजे कीं मीं ? ”

सातव्या आत्म्याचें हें बोलणें ऐकतांच इतर सहा आत्म्याना त्याची कींव येऊन त्यानी त्याच्याकडे पाहिलें; पण ते त्यावर कांहींच बोलले नाहीत आणि जसजशी रात्र वाढत चालली तसतसे ते सहा आत्मे एका नवीन आणि आनंददायक शरण–भावनेमध्यें गुरफटून ( बंड-खोरीची वृत्ति सोडून देऊन) एका मागून एक झोंपी गेले.

परंतु तो सातवा आत्मा मात्र सर्व वस्तुमात्राच्या मागें असलेल्या शून्यत्त्वाकडे टक लावून पाहात जागत राहिला.

# युद्ध

एके दिवशी रात्री राजवाड्यामध्यें एक मेजवानी चालली होती इतक्यांत एक इसम तेथें आला आणि त्यानें राजासमोर लोटांगण घातलें. सर्व निमंत्रित मंडळी त्याच्याकडे पाहू लागली. त्या इसमाचा एक डोळा बाहेर आलेला असून त्याच्या डोळ्याच्या रिकाम्या खाचेंतून रक्त वाहात असलेलें त्यांना दिसलें.

राजानें विचारलें, "तुला काय झालें हें?"

त्या इसमानें उत्तर दिलें, "महाराज! मी धंदेवाईक चोर आहें. आज अमावास्या असल्यामुळें मी एका सावकाराचें दुकान फोडायला गेलों. परंतु खिडकींतून आंत उतरतांना मी चुकून विणकराच्या दुकानांत शिरलों.

अंधारामध्यें मी त्या विणकराच्या मागाला जाऊन थडकलों आणि मागाचें टोंक माझ्या डोळ्यात घुसून तो फुटला. महाराज! त्या विणकराविरुद्ध माझी तक्रार आहे. मला न्याय हवा आहे.'

हें ऐकताच राजानें विणकराला बोलावणें पाठविलें आणि तो येऊन हजर होताच राजाने असा निर्णय दिला की, 'या विणकराचा एक डोळा फोडून टाका.'

यावर तो विणकर म्हणाला, "महाराज! आपला निर्णय अगदी न्याय्य आहे. माझा एक डोळा उपटून काढला पाहिजे हे आपलें म्हणणें बरोबर आहे. परतु कापड विणताना त्याच्या दोन्ही बाजू मला पाहतां याव्यात यासाठी माझे दोन्ही डोळे शाबूत असणें आवश्यक आहे. तरीपण माझ्या शेजारी एक चाभार राहतो. त्यालाहि दोन डोळे आहेत नि त्याच्या धंद्याला दोन्ही डोळ्यांची मुळींच जरूर नाही."

हे एकून राजानें चाभाराला बोलावणे पाठविलें व तो येतांच त्याच्या दोन डोळ्यांपैकी एक डोळा फोडून टाकण्यात आला.

आणि न्यायदेवतेचें समाधान झालें.

## कोल्हा

एका कोल्ह्यानें सूर्योदयाच्या वेळी आपल्या सावली-कडे पाहिलें व तो स्वतःशी म्हणाला, ' आज दुपारच्या जेवणाला मला सबंध उंटच लागणार! ”

आणि सारी सकाळ त्यानें उंटाचा शोध करण्यात घालविली परंतु दुपारच्या वेळी जेव्हा त्यानें पुन्हां आपल्या सावलीकडे पाहिलें तेव्हां तो म्हणाला, “ एक उंदीरसुद्धां पुरेसा होईल मला ! ”

## शहाणा राजा

एके काळीं वीरानी ( वैराणपणा-ओसाडपणा ) नांवाच्या एका दूरच्या शहरात एक राजा राज्य करीत होता. तो मोठा शूर व शहाणा होता. त्याच्या सामर्थ्यामुळें लोक त्याला घाबरत आणि त्याच्या शहाणपणामुळें त्याच्यावर प्रेम करीत.

त्या शहराच्या मध्यभागीं एक विहीर होती. तिचें पाणी थंडगार आणि स्फटिकासारखें स्वच्छ होतें. शहरांतील सर्व लोक त्या विहिरीचें पाणी पीत, इतकेंच नव्हे तर स्वतः राजा आणि त्याच्या दरबारांतील

वडीवडी मंडळी देखील त्याच विहिरीचें पाणी पीत, कारण त्या शहरात दुसरी विहीरच नव्हती.

एके दिवशीं रात्रीं सगळे लोक झोपले असता एक चेटकीण त्या शहरात शिरली आणि त्या विहिरीत कसल्या तरी चमत्कारिक द्रव पदार्थाचे सात थेंब टाकून ती म्हणाली, "या क्षणापासून जो कोणी या विहिरीतील पाणी पिईल तो वेडा होईल !"

दुसऱ्या दिवशीं सकाळी राजा आणि त्याचा प्रधान या दोघाशिवाय इतर सर्व नागरिक त्या विहिरीचें पाणी प्याले आणि त्या चेटकीणीच्या भाविष्यवाणीप्रमाणें सर्वांना वेड लागलें.

मग सबंध दिवसभर गल्लीबोळातून व भरबाजारात लोक एकमेकाच्या कानाशीं लागून कुजबुजूं लागले, "आपल्या राजाला वेड लागलय ! आपला राजा नि त्याचा प्रधान या दोघांची विवेकशक्ति नष्ट झाली आहे. आपल्यावर वेडया राजाचें राज्य मुळीच असता कामा नये. आपण त्याला पदच्युत केलेंच पाहिजे."

त्या दिवशीं संध्याकाळीं राजानें एका सोन्याच्या पेल्यातून त्या विहिरीचें पाणी आणण्याची आज्ञा केली

आणि त्याप्रमाणें तें पाणी येतांच त्यानें तें भरपूर पिऊन घेतलें व आपल्या प्रधानालाहि प्यावयास दिलें.

त्याबरोबर त्या दूरच्या वीरानी शहरांत आनंदी-आनंद केला; कारण त्या शहराचा राजा आणि त्याचा प्रधान यांची डोकीं पूर्ववत् ठिकाणावर आली होतीं.

## महत्त्वाकांक्षा

एका दारुच्या गुत्त्यांत तीन इसमांची गांठ पडली. त्यांच्यापैकी एकजण विणकर होता, दुसरा सुतार होता आणि तिसरा मजूर होता.

विणकर म्हणाला, "आज मी एक सुरेख मलमलीचें प्रेतवस्त्र दोन मोहरांना विकलें आहे. तेव्हां चला, आपण मनसोक्त दारु पिऊन घेऊं."

सुतार म्हणाला, "आज माझ्याजवळची सर्वोत्कृष्ट शवपेटी विकली गेली तेव्हा आज आपण दारुबरोबर खूपसे कबाब (भाजलेलें मांस)हि खाऊ."

मजूर म्हणाला, "मी आज फक्त एकाच प्रेतासाठीं खड्डा खणला, परतु मृताच्या आप्तेष्टांनीं मला त्याचीच

दुप्पट मजुरी दिली. तेव्हा चला, आपण थोडी मिठाईहि खाऊं."

आणि त्या दिवशीं सध्याकाळीं त्या गुत्त्यांत खूप धामधूम सुरू होती. कारण ते तिघेजण पुन: पुन: दारू, मास व मिठाई मागवीत होते आणि ते मोठ्या खुषींत होते.

गुत्त्याचा मालक आनदानें आपले दोन्ही हात एक-मेकावर चोळीत आपल्या बायकोकडे पाहून हसत होता. कारण आज त्याची गिऱ्हाइकें मुक्तहस्तानें पैसे खर्च करीत होतीं.

ते तिघे गुत्त्यातून बाहेर पडले तेव्हां चंद्र बराच वर आला होता. ते मोठमोठ्यानें गात व आरडाओरडा करीत रस्त्यानें चालू लागले. गुत्तेवाला व त्याची बायको गुत्त्याच्या दारांत उभी राहून त्याऱ्याकडे पाहात होतीं.

गुत्तेवाल्याची बायको म्हणाली, "किती चांगले होते हे लोक! किती उदार नि किती रंगेल! आपल्या नशीबानें दररोज असलें गिऱ्हाईक मिळेल तर किती छान होईल! मग आपल्या बाळाला गुत्तेवाला व्हावें लागणार नाहीं नि इतके काबाडकष्टहि करावे लागणार नाहीत. आपण त्याला शिक्षण देऊ शकूं नि तो पादरी (धर्मोपदेशक) देखील होऊ शकेल."

## नवें सुख

काल रात्रीं मी एका नवीन सुखाचा शोध लावला आणि मी त्याची पहिल्यांदांच प्रचीति घेणार इतक्यात एक देवदूत आणि एक सैतान जोरानें धांवत माझ्या घराकडे आले. माझ्या दारांतच त्यांची गाठ पडली आणि मी नुकत्याच निर्माण केलेल्या सुखावरून ते आपापसात झगडू लागले.

त्यांच्यापैकीं एकजण म्हणत होता, 'तें पाप आहे.'

आाण दुसरा म्हणत होता, 'तें पुण्य आहे.'

## दुसरी भाषा

मला जन्मास येऊन तीनच दिवस झाले होते. मी माझ्या रेशमी पाळण्यात पडल्या पडल्या आपल्या सभोवतालच्या नव्या जगाकडे आश्चर्ययुक्त भयानें टक लावून पहात होतों. इतक्यांत माझ्या आईनें दाईला विचारलें, "कसं काय चाललय माझ्या बाळाचं?"

दाईनें उत्तर दिलें, "फार छान चाललय बाईसाहेब! मी त्याला तीनदा पाजलें. इतकें खेळकर तान्हें मूल आजपर्यंत मी कधींच पाहिलें नव्हतें."

हें ऐकून मी अगदीं क्षुब्ध झालों आणि मोठ्यानें ओरडलों, "हें मुळींच खरं नाहीं, आई! कारण पाळण्यांतील माझें अंथरूण माझ्या अंगाला रुततें आहे

नि हिचें जें दूध मी प्यालों ते माझ्या जिभेला अगदीं कडू लागलें. शिवाय हिच्या वक्षस्थळाच्या घाणेरड्या वासाची मला अगदीं शिसारी येते. मी अत्यंत दुःखी आहें!'

पण माझें म्हणणें माझ्या आईलाहि कळलें नाहीं अथवा दाईलाहि समजलें नाहीं. कारण ज्या भाषेंत मी बोललों ती या जगांतील नसून ज्या जगातून मी नुकताच आलों होतों तेथील होती.

माझ्या वयाच्या एकविसाव्या दिवशीं मला ख्रिस्ती धर्मांत घेण्याचा विधि चालू असतां पादरीबुवा आईला म्हणाले, "बाईसाहेब, तुमचा मुलगा जन्मतःच ख्रिस्त-भक्त निपजला याबद्दल तुम्हांला खरोखर फार आनंद वाटला पाहिजे."

हें ऐकून मला आश्चर्य वाटलें आणि मी त्या पाद्र्याला म्हणालों, "तर मग तुझी स्वर्गांतील आई दुःखी असली पाहिजे, कारण तू कांहीं जन्मतःच ख्रिश्चन नव्हतास!"

पण त्या पाद्र्यालाहि माझी भाषा कळली नाहीं.

सात महिन्यानतर एक दिवशीं एक ज्योतिषी माझ्या-कडे पाहून माझ्या आईला म्हणाला, "बाईसाहेब, तुमचा मुलगा मुत्सद्दी नि फार मोठा पुढारी होणार आहे"

हें एकून मी ओरडून म्हणालों, " हें भाकीत साफ खोटं आहे, कारण मी गवई होणार आहें. गवयाखेरीज मी इतर काहीहि होणार नाहीं."

पण त्या वयांतील माझी भाषासुद्धा कोणाला समजली नाहीं आणि हे पाहून मी अगदीं आश्चर्यचकित झालों.

आतां माझें वय तेहतीस वर्षांचें आहे.

या अवधींत माझी आई, दाई व तो पाद्री तिघेहि देवाघरीं गेले आहेत. ( ईश्वर मृतात्म्यांस शांति देवो ! ) तो ज्योतिषी मात्र अद्यापि हयात आहे. कालच तो मला देवळाच्या दारांत भेटला होता. आमचें बोलणें चालू असतां तो मला म्हणाला, " तूं फार मोठा गवई होणार हें मी केंव्हाच ओळखलें होतें. तूं अगदीं लहान होतास तेंव्हाच मीं हे भविष्य सांगून ठेवलें होतें."

आणि त्याच्या बोलण्यावर माझा विश्वास बसला—कारण आतां मी देखील त्या दुसऱ्या जगाची भाषा विसरून गेलों आहें.

## डाळिंब

मी एका डाळिंबाच्या हृदयात वास करीत असतां एके दिवशीं त्या डाळिंबातील एक बी असें म्हणत असल्याचें मी ऐकलें, " आज ना उद्यां मी एक झाड बनेन. मग वायुलहरी गाणें गात माझ्या फांद्यामधून भिर-भिरतील, सूर्याचे किरण माझ्या पानावर नृत्य करतील आणि सर्व ऋतूमध्यें ( सदासर्वकाळ ) मी सुदृढ व सुंदर राहीन. "

त्यावर दुसरी बी म्हणाली, " मी तुझ्या एवढी लहान होत्यें तेव्हा मला देखील असेंच वाटायचें. पण आतां प्रत्येक वस्तूचें मोजमाप करता येऊं लागल्यापासून

आपल्या आशा व्यर्थ होत्या हें मला कळून चुकलें आहे."

तिसरीहि एक बी म्हणाली, "आपलें भवितव्य उऽज्वल असेल असें वाटण्यासारखी कोणतीच गोष्ट मला आपणामध्यें दिसत नाहीं."

चौथी बी म्हणाली, "पण उऽऽज्वल भविष्य नसेल तर आपले आयुष्य म्हणजे निव्वळ एक मस्करीच म्हटली पाहिजे, नाही का?"

पाचवी बी म्हणाली, "आपण कोण आहोंत हेंच जिथें आपल्याला समजलेले नाहीं तिथें आपण पुढें कोण होणार यासबधी हा वितंडवाद कशाला?"

सहावी बी म्हणाली, "आपण आज जसे काहीं आहोंत तसेंच सदैव राहणार आहोंत!"

सातवी बी म्हणाली, "प्रत्येक वस्तूचें पुढें काय होणार याची अगदी स्पष्ट कल्पना मला आहे, परंतु मला ती शब्दानी व्यक्त करता येत नाही."

त्यानंतर आठवी बी बोलली—तिच्यामागून नववी बोलली—मग दहावी बोलली—आणि मग सगळ्याच जणी बोलूं लागल्या. त्या गोंधळामध्यें कोण काय बोलत आहे याचाच मला उमज पडेना.

आणि म्हणून त्याच दिवशीं मी डाळिंबांतून निघून बेदाना* नांवाच्या एका फळाच्या हृदयात जाऊन बसलों. कारण त्या फळात बिया फार थोड्या असतात आणि ज्या असतात त्याहि बहुतेक शात असतात.

---

*बेदाना हें अगदीं हुबेहूब डाळिंबासारखेच फळ असते. त्यात बीं नसते. म्हणूनच त्याला बे-दाना (दाना=दाणा=बी) असें म्हणतात. हें फळ वायव्य सरहद्द प्रात, इराण, अफगाणिस्तान वगैरे प्रदेशात होते दिल्लीच्या बाजारात खूप मोठ्या प्रमाणावर दिसते. बिया असलेल्या डाळिंबाला उर्दूत 'अनार' म्हणतात आणि या बी रहित डाळिंबाला 'बेदाना' म्हणतात —अनुवादक

## दोन पिंजरे

माझ्या वडिलांच्या बागेंत दोन पिंजरे आहेत. त्यापैकी एका पिंजऱ्यांत माझ्या वडिलांच्या गुलामांनी नीनवा*च्या ओसाड प्रदेशातून पकडून आणलेला सिंह आहे आणि दुसऱ्या पिंजऱ्यात एक न गाणारी मैना आहे.

रोज सकाळी ती मैना सिंहाला हाक मारून म्हणते, " सुप्रभातम्, कैदी–दादा ! "

---

*नीनवा म्हणजे सुंदर, सुरेख तसेच नीनवा हे एका प्राचीन शहराचे नाव आहे. या शहरात हजरत यूनिस याचा जन्म झाला होता. —अनुवादक.

## तीन मुंग्या

एक माणूस उन्हामध्ये झोपी गेला होता. त्याच्या नाकावर तीन मुंग्यांची गांठ पडली आपापल्या टोळीच्या रिवाजाप्रमाणें एकमेकींना नमस्कार वगैरे केल्या-नंतर त्या तिघीजणी तेथेंच बोलत उभ्या राहिल्या

पहिली मुंगी म्हणाली, " इतक्या ओसाड टेकड्या नि मैदानें आजपर्यंत मी कधीं पाहिली नाहींत. कसला तरी एखादा दाणा मिळेल म्हणून मी दिवसभर शोध शोध शोधले पण मला एकहि दाणा सापडला नाही "

दुसरी मुंगी म्हणाली, " मी देखील एकूणएक कोने-कोपरे धुंडाळले पण मलाहि कांहीं मिळालें नाहीं. मला वाटतें आमच्या जातींतील लोक मऊ, अस्थिर नि जिथें

कधीच काहीं पिकत नाही अशा ज्या जमिनीसंबधी बोलत असतात तीच ही जमीन असावी."

नंतर तिसऱ्या मुगीनें आपली मान वर केली आणि ती म्हणाली, "माझ्या मैत्रिणींनो! यावेळीं आपण त्या सर्वश्रेष्ठ मुगळ्याच्या* नाकावर उभ्या आहोंत. हा मुंगळा सर्वशक्तिमान आणि अनादि-अनंत आहे. याचें शरीर एवढे अजस्त्र आहे की ते आपण पाहू शकत नाही. याची सावली इतकी अवाढव्य आहे की आपण तिचा अंदाजहि करू शकणार नाहीं. याचा आवाज इतका प्रचंड आहे की तो आपण ऐकू शकत नाही. हा मुगळा सर्वव्यापी आहे."

तिसऱ्या मुगीचें हें बोलणें ऐकून पहिल्या दोन मुग्यांनी एकमेकीकडे पाहिलें आणि त्या जोराने हसूं लागल्या.

त्याच क्षणी तो मनुष्य जरासा हलला आणि झोपेंतच त्यानें आपला हात वर उचलून आपलें नाक खाजविलें. त्याबरोबर त्या तीन्ही मुंग्या चिरडून गेल्या.

---

* मुगळा–मुगीचे पुल्लिंगी रूप, नर मुगी—

## कबर खोदणारा

एकदा मी माझ्या एका मृत आत्म्याला खड्ड्यांत पुरून त्यावर माती सारीत असतां कबरस्तानात खड्डे खणण्याचें काम करणारा माणूस तेथें येऊन मला म्हणाला, " या ठिकाणी प्रेतें पुरण्यासाठीं जितके लोक येतात त्या सर्वांमध्यें मला तूंच एकटा आवडतोस."

मी म्हणालों, " तुझें बोलणें ऐकून मला अत्यंत आनंद झाला. पण मीच तुला का बरें आवडतों ? "

" कारण इतर लोक रडत येतात नि रडतच परत जातात—फक्त तूच एकटा हंसत येतोस नि हंसत जातोस ! " त्यानें उत्तर दिलें

## देवळाच्या पायऱ्यांवर

काल संध्याकाळीं देवळाच्या संगमरवरी पायऱ्यांवर दोन पुरुषांच्यामध्यें बसलेली एक बाई मी पाहिली. त्या बाईचा चेहरा एका बाजूनें फिक्कट दिसत होता तर दुसऱ्या बाजूनें तो लाजेमुळें गुलाबी झालेला दिसत होता.

## भाग्यवान शहर

माझ्या तरुणपणी मला असें सांगण्यांत आलें कीं, एका शहरामध्यें प्रत्येक जण धर्मग्रंथांत लिहिल्याप्रमाणें आपलें आचरण ठेवणारा आहे.

तें ऐकून मी म्हणालों, " मी तें शहर शोधून काढीन नि तेथील धन्यता अनुभवीन. " तें शहर खूप दूर होतें. मी माझ्या प्रवासाची जगी तयारी केली. चाळीस दिवस प्रवास केल्यानतर मला तें शहर दिसलें आणि एकेचाळीसाव्या दिवशीं मी त्या शहरात प्रवेश केला आणि

अरे बापरे ! त्या शहरांतील प्रत्येक नागरिकाला एकच डोळा व एकच हात होता, तें पाहून मी आश्चर्यचकित झालों आणि मनाशीं म्हणालों, " या इतक्या

पवित्र नगरातील लोकांना फक्त एकच डोळा नि एकच हात असावा ना ! ”

त्यानाहि अत्यंत आश्चर्य वाटत असल्याचें मला दिसलें. कारण माझे दोन हात आणि दोन डोळे पाहून त्यांना नवल वाटत होतें. म्हणून ते आपापसात बोलत असता मी त्यांना म्हणालों, “ ज्या ठिकाणीं राहणारा प्रत्येक मनुष्य धर्मग्रंथांत लिहिल्याप्रमाणें आपलें आचरण ठेवतो तें भाग्यशाली शहर खरोखरी हेंच काय?”

त्यावर ते म्हणाले, “ होय हेंच तें शहर. ”

“ मग तुमची ही अशी दशा कशानें झाली ? तुमचे उजवे डोळे अन् उजवे हात कुठें गेले ?” मी विचारलें.

हें ऐकून ते सगळेजण सद्गदित झाले आणि म्हणाले, “ आमच्याबरोबर चला अन् पहा. ”

असें म्हणून ते मला शहराच्या मध्यभागीं असलेल्या एका देवळामध्यें घेऊन गेले. त्या देवळात वाळून शुष्क झालेल्या हातांचा व डोळ्यांचा एक भला मोठा ढीग पडलेला मला दिसला. तेव्हा मी म्हणालों, “ अरेरे ! कोणत्या विजेत्यानें तुमच्यावर हा क्रूर अत्याचार केला ? ”

हें ऐकून त्या लोकांनीं आपापसात कुजबुजण्यास सुरवात केली. अखेर त्यांच्यापैकीं एक वयोवृद्ध गृहस्थ

पुढें झाला आणि म्हणाला, "आम्हीं स्वत:च केलें आहे हें ! आमच्या ठिकाणीं असलेल्या पापावर विजय मिळविण्यासाठीं देवानेंच आम्हाला हें करण्याची प्रेरणा दिली."

इतकें बोलून तो मला एका उंच वेदीकडे घेऊन गेला. आमच्या मागोमाग इतर सर्व लोक आले. त्या वेदीवर कोरलेला एक लेख त्यानें मला दाखविला व तो मी वाचूं लागलों.

"तुझ्या उजव्या डोळ्यानें पाप केलें तर तू तो उपटून काढ व दूर फेंकून दे. कारण सर्व शरीर नरकांत पडण्यापेक्षा त्याच्या एखाद्या अवयवाचा नाश होणें हेंच तुला अधिक श्रेयस्कर होय तसेंच तुझ्या उजव्या हातानें पाप केलें तर तूं तो कापून काढ व दूर फेंकून दे. कारण सर्व शरीर नरकांत जाण्यापेक्षां त्याच्या एखाद्या अवयवाचा नाश होणें हेंच तुला अधिक श्रेयस्कर होय."

आता मला उमगलें आणि तेथें जमलेल्या सर्व लोकांकडे वळून मी ओरडून विचारलें, "तुमच्यापैकीं एकाहि पुरुषाला अथवा स्त्रीला दोन डोळे अथवा दोन हात नाहींत काय?"

" नाहीं, एकालाहि नाहींत. ज्यांना धर्मग्रंथ वाचतां येत नाहींत व त्यांतील आज्ञांचा अर्थ समजत नाही अशीं लहान मुलें वगळल्यास या सबंध शहरात दोन डोळे व दोन हात असलेली एकहि व्यक्ति नाहीं."

त्या देवळातून बाहेर पडतांच मी ताबडतोब त्या भाग्यवान शहराला रामराम ठोकला. कारण मी कांहीं कुक्कुलें बाळ नव्हतों आणि मी धर्मग्रंथ (व तो शिलालेख) वाचू शकत होतों.

## सत् देव आणि असत् देव

सत् देव आणि असत् देव यांची पर्वत शिखरावर गाठ पडली.

सत् देव म्हणाला, " नमस्ते भाई ! "

असत् देवानें काहींच उत्तर दिलें नाही.

तेव्हा सत् देव म्हणाला, " आज तुझें काहींतरी बिनसलेलें दिसतें आहे. "

यावर असत् देव म्हणाला, " होय, ब-याच दिवसांपासून लोक नेहमीं तुझ्या जागी मला समजूं लागले आहेत, तुझ्या नांवानें मला संबोधीत आहेत अन्

तुझ्याशीं वागावें तसें मांझ्याशीं वागत आहेत आणि हे मला मुळीच पसत नाहीं."

तेव्हा सत् देव म्हणाला, "पण मला देखील लोक तुझ्या जागीं समजू लागले आहेत अन् तुझ्या नांवाने मला संबोधित आहेत.

हे ऐकून माणसाच्या मूर्खपणाला शिव्याशाप देत असत् देव निघुन गेला.

## पराजय

हे पराजया! माझ्या पराजया! तूं माझा एकांत आहेस आणि तुझ्यामुळेंच हा अलिप्तपणा मला लाभला आहे.

हजारों विजयापेक्षाहि तू मला अधिक प्रिय आहेस आणि जगद्व्यापी कीर्तीहूनहि तूं माझ्या हृदयाला अधिक मधुर वाटतोस.

हे पराजया, माझ्या पराजया! तू माझें आत्मज्ञान आहेस आणि जगाला आव्हान देऊं शकणारें माझें सामर्थ्यहि तुझ्यामुळेंच आहे.

मी अजून तरुण आहें नि माझ्या पायात वेग आहे, हें तुझ्या द्वारेंच मला समजतें आणि तुझ्या कोमेजून जाणाऱ्या जयमालांच्या जाळ्यांत मी अडकत नाही. तुझ्या ठायीं मला एकाकीपणा आढळला आणि लोकांनीं आपल्याला टाळण्यांत व आपला तिटकारा करण्यांत जो आनंद भरलेला आहे तोहि मला तुझ्या-मुळेंच अनुभवावयास मिळाला.

हे पराजया, माझ्या पराजया ! तूच माझी लखलखणारी तलवार आणि ढाल आहेस. राजसिंहासनावर बसणें म्हणजे गुलामगिरींत अडकणें, इतरांना आपलें मनोगत कळणें म्हणजे आपण त्यांच्या पातळीपर्यंत खाली उतरणें, इतरांना आपलें निश्चित आकलन होणें म्हणजे पूर्णा-वस्थेला पोंचणें व एखाद्या पिकलेल्या फळाप्रमाणें खाली पडून नाश पावणें होय हें मी तुझ्याच नेत्रात वाचलें आहे.

हे पराजया, माझ्या पराजया ! तूं माझा निर्भय साथी आहेस माझी गाणीं, माझीं आक्रंदनें आणि माझीं मौनें तूच ऐकशील आणि पंखाचा फडफडाट, समुद्राच्या आग्रहयुक्त गर्जना व रात्री जळणारे पर्वत याच्यासंबंधीं तुझ्याखेरीज इतर कोणीहि माझ्याशी बोलणार नाही.

तूंच एकटा उभा चढ असलेल्या व खडकाळ अशा माझ्या आत्म्यावर आरोहण करशील.

हे पराजया, माझ्या पराजया! माझ्या अमर धैर्या! आपण दोघे मिळून वादळाबरोबर खदखदां हंसू आणि आपल्यातील जें जें काही मरून जाईल तें तें गाडून टाकण्यासाठीं आपण बरोबरीनें खड्डे खणूं आणि आपण निश्चयानें सूर्याच्या उन्हात उभे राहूं व मग जगाला आपलें भय वाटूं लागेल

## रात्र आणि वेडा

"हे रात्रि, मी अगदी तुझ्यासारखाच आहें—कृष्ण आणि नग्न! माझ्या दिवास्वप्नाहून कितीतरी वर असलेल्या जळत्या मार्गावरून मी चालतों आणि जेव्हा जेव्हा माझा पाय जमिनीला स्पर्श करतो तेव्हा तेव्हा एक प्रचंड ओकवृक्ष उत्पन्न होतो."

"छेः, रे वेड्या! तूं माझ्यासारखा नाहींस, कारण वाळूवर आपल्या पावलांचा केवढा मोठा ठसा उमटला आहे हें पाहण्यासाठी तूं अजूनहि मागें वळून बघतोस."

" हे रात्रि, मी तुझ्यासारखाच आहें—निःस्तब्ध आणि गभीर! माझ्या एकाकीपणाच्या गाभाऱ्यांत एक देवता प्रसूतिशय्येवर पडलेली आहे. तिच्या उदरातून जन्म घेत असलेल्या जीवाच्या ठिकाणी स्वर्ग हा नरकाला स्पर्श करीत आहे. "

" छेः रे वेड्या! तूं माझ्यासारखा नाहीस, कारण अजूनहि वेदनेच्या दर्शनानें तुझा थरकाप होतो आणि नरकाचें गीत तुला घाबरवून सोडतें. "

" हे रात्रि, मी तुझ्यासारखाच आहे-रानटी नि भयंकर, कारण माझे कान देखील जित राष्ट्राच्या आक्रो-शांनीं आणि विस्मृत देशांसाठी टाकल्या जाणाऱ्या उसाशांनीं कोंदून गेले आहेत. "

" छेः रे वेड्या माणसा! तू माझ्यासारखा नाहीस, कारण अजूनहि आपला क्षुद्र आत्मा आपला साथी आहे असें तुला वाटतें आणि आपल्या विराट आत्म्याशीं तुला मैत्री जोडता येत नाही. "

" मी तुझ्यासारखाच आहें, गे रात्रि!—क्रूर नि जरब बसविणारा! कारण माझें अतःकरण समुद्रावर जळणाऱ्या जहाजामुळें प्रकाशमान झालेलें आहे आणि ठार झालेल्या योद्धयांच्या रक्तानें माझे ओंठ ओले झालेले आहेत."

" नाही रे वेड्या ! तू माझ्यासारखा नाहींस. कारण अजूनहि तुझ्या हृदयात आपल्यासारख्या अन्य आत्म्याची अभिलाषा आहे आणि तूं स्वतःच आपला कायदा बनलेला नाहींस "

" हे रात्रि ! मी तुझ्यासारखाच आहे. प्रसन्न आणि आनंदी–कारण आता जो कोणी माझ्या सावलींत राहतो तो कुणीहि न वापरलेल्या मद्याने बेहोश असतो आणि जी माझें अनुसरण करते ती मोठ्या खुषीत पाप करीत असते. "

" नाहीं रे वेड्या माणसा ! तू माझ्यासारखा नाहींस, कारण तुझा आत्मा सात पदरी बुरख्यामध्ये गुरफटलेला आहे आणि तुझें हृदय तुझ्या हातात नाहीं. "

" हे रात्रि ! तुझ्यासारखाच आहें मी–सोशिक आणि भावनोत्कट–कारण माझ्या हृदयात सुकून गेलेल्या चुंबनाच्या प्रेतवस्त्रांत गुडाळलेले हजारों मृत प्रेमी जीव पुरलेले आहेत. "

" असं ? अरे वेड्या, तू माझ्यासारखा आहेस ? काय तू माझ्यासारखाच आहेस ? तू वादळाच्या उमद्या घोड्यावर बसू शकतोस ? तू बिजलीची तलवार पेलूं शकतोस ? "

" होय, हे रात्रि ! मी तुझ्यासारखाच आहें—तुझ्या सारखाच सामर्थ्यवान आणि उत्तुंग आहें मी. खाली पडलेल्या देशाच्या ढिगाऱ्यावर माझें सिंहासन उभारलेलें आहे आणि माझ्या वस्त्राच्या पदराचें चुंबन घेण्यासाठी दिवस माझ्याहि समोरून जातात; परंतु ते माझ्या चेहऱ्याकडे कधींहि टक लावून पहात नाहींत."

" माझ्या कृष्णतम हृदयाच्या बाळा ! तूं माझ्या-सारखाच आहेस काय ? माझे निरंकुश विचार तुझ्याहि मनांत घोळत असतात काय ? आणि माझी व्यापक भाषा तूंहि बोलत असतोस काय ? "

" होय, गे रात्रि ! आपण जुळीं भावंडें आहोंत, कारण तूं अवकाशाचें अंतरंग व्यक्त करतेस तर मी माझ्या आत्म्याचें अंतरंग उघडे करतो."

## चेहरे

हजारों भाव अंकित असलेला चेहराहि मी पाहिला आहे आणि जणू साच्यातून ओतून काढलेला असा, एकच भाव अंकित असलेला चेहराहि मी पाहिला आहे.

ज्याच्या बाह्य भपक्यामधून त्याच्या तळाशीं असलेला कुरूपपणा मला स्पष्ट दिसू शकत होता असाहि चेहरा मी पाहिला आहे आणि ज्याचें वास्तविक सौंदर्य पाहण्यासाठी मला त्याच्यावरील झिलई बाजूस सारावी लागली असाहि चेहरा मी पाहिला आहे.

ज्याच्यावर खूप रेघोटया ओढलेल्या आहेत पण कांहींच लिहिलेलें नाही असा वृद्ध चेहराहि मी पाहिलेला

आहे आणि ज्याच्यावर एकहि रेघ ओढलेली नाहीं परंतु एकूण एक गोष्ट कोरलेली आहे असा गुळगुळीत चेहराहि मी पाहिलेला आहे.

मला चेहरे ओळखता येतात; कारण माझ्या स्वतःच्या डोळ्यांनी विणलेल्या वस्त्रातून मी पाहात असतों. यामुळें बाह्य आवरणाखालीं दडलेली वस्तुस्थिति मला दिसते.

## महासागर

माझा आत्मा आणि मी महासागरावर स्नानासाठी गेलों. किनाऱ्यावर जाऊन पोंचल्यानतर एखादें निर्जन व निवात स्थान शोधण्यासाठी आम्ही हिंडूं लागलो

आम्ही चाललों असता करड्या रंगाच्या खडकावर बसलेला एक मनुष्य आम्हाला दिसला. तो एका पिशवीतून चिमट चिमटभर मीठ काढून ते समुद्रांत फेंकत होता.

" निराशावादी म्हणतात तो हाच ! " माझा आत्मा म्हणाला, " आपण हें स्थान सोडून दुसरीकडे जाऊ. इथें आपल्याला स्नान करता येणार नाही. "

आम्ही पुढें चालूं लागलों. चालतां चालता आम्हा एका खाडीच्या तोंडाशी जाऊन पोंचलों. त्या ठिकाणीं एका पाढऱ्या खडकावर एक इसम उभा असलेला आम्हांला दिसला त्याच्या हातात एक रत्नजडित पेटी होती त्या पेटींतून थोडी थोडी साखर काढून तो ती समुद्रांत फेंकीत होता.

“ आणि हा आहे आशावादी ! ” माझा आत्मा म्हणाला, “ आपली विवस्त्र शरीरें याच्याहि दृष्टीस पडता कामा नयेत. ”

आम्ही आणखी पुढें चाललों. इतक्यात समुद्र-किनाऱ्यावर बसलेला एक मनुष्य आमच्या दृष्टीस पडला. तो मेलेले मासे उचलून ते हळुवारपणें परत पाण्यात सोडीत होता.

“ याच्याहि समोर आपल्याला आंघोळ करता यायची नाहीं. ” माझा आत्मा म्हणाला, “ कारण हा हळव्या मनाचा भूतदयावादी आहे. ”

आणि आम्हा पुढें चाललों.

नतर आम्हाला आणखी एक मनुष्य दिसला. तो वाळूवर आपल्याच सावलीचें चित्र रेखाटीत होता. प्रचंड

लाटा येत आणि त्याचें रेखाचित्र पुसून टाकीत. तरीहि तो पुनः पुन: तें चित्र रेखाटीतच होता.

" हा आहे साक्षात्कारी अध्यात्मवादी ! " माझा आत्मा म्हणाला, " यालाहि आपण इथेंच सोडू.

आम्ही पुन्हां चालूं लागलों. थोड्या वेळानें आम्ही एका लहानशा व निवात खाडीपाशी जाऊन पोचलों. त्या ठिकाणी एक मनुष्य समुद्रावरील फेंस गोळा करून एका संगमरवरासारख्या शुभ्र दगडाच्या कमंडलूत भरत असलेला आम्हाला दिसला.

" हा आहे आदर्शवादी ! " माझा आत्मा म्हणाला, " आपलीं नग्न शरीरें याच्याहि दृष्टीस पडता कामा नयेत. "

आणि आम्ही पुढें चाललों. इतक्यात मोठ्यानें उच्चारलेले पुढील शब्द आमच्या कानी आले. " हाच तो समुद्र. हाच तो खोल समुद्र. हाच तो विशाल नि सामर्थ्यशाली समुद्र ! " आम्ही त्या आवाजाजवळ जाऊन पाहिलें तों समुद्राकडे पाठ केलेला एक मनुष्य आम्हांला दिसला. तो आपल्या कानाशीं एक शिंपला धरून त्यातील गुणगुण ऐकत होता.

माझा आत्मा म्हणाला, " चल आपण पुढें जाऊं. हा आहे वास्तववादी. कोणत्याहि वस्तूचें संपूर्ण ग्रहण करतां न आल्यामुळें तो त्या वस्तूच्या एका लहानशा तुकड्यावरच आपलें लक्ष केंद्रित करीत असतो."

आणि मग आम्ही पुढें निघालों. थोड्या वेळानंतर सभोंवार खडक असलेल्या व झाडाझुडपांनीं आच्छादिलेल्या एका ठिकाणीं आम्हाला एक मनुष्य दिसला त्यानें आपलें डोकें वाळूत पुरून घेतलेलें होतें. तें पाहून मी माझ्या आत्म्याला म्हणालों, " या ठिकाणीं आपल्याला स्नान करण्यास कांही हरकत नाहीं. कारण हा माणूस आपल्याला पाहू शकत नाहीं."

" छेः छे.! माझा आत्मा मला म्हणाला, हा तर त्या सर्वांहून भयंकर आहे, कारण हा पावित्र्यवादी आहे."

आता माझ्या आत्म्याच्या चेहऱ्यावर दुःखाची दाट छाया पसरली आणि त्याच्या स्वरांतहि निराशा जाणवू लागली

" आपण येथून खूप दूर जाऊं." माझा आत्मा म्हणाला, " कारण आपल्याला स्नान करता येईल असें निर्जन आणि निवांत स्थान येथें नाहींच. येथील

वाऱ्यानें माझे सोनेरी केंस उडवावेत अथवा येथील हवे-
मध्यें माझी गोरी छाती उघडी पडावी अथवा येथील
प्रकाशानें माझी पवित्र नग्नता अनावृत करावी असें
मला वाटत नाहीं.

तेव्हां मग आम्ही त्या समुद्राचा नाद सोडून त्याहून
अधिक मोठ्या अशा सागराच्या शोधार्थ निघालों.

## सुळावर

मी मोठ्यानें ओरडून लोकाना म्हणालों, " मला सुळावर ( क्रूसावर ) चढविण्यांत येणार ! "

तेव्हां ते म्हणाले, " तुझ्या रक्ताचे डाग आम्ही आमच्या शिरावर का म्हणून पडूं द्यावेत?

" वेड्यानो, सुळीं देण्याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्या मार्गानें तुम्हीं महत्पदाला पोंचणार ? " मी उत्तरलों.

त्यांनी माझें म्हणणें ऐकलें आणि मला सुळीं देण्यांत आलें. सुळावर चढल्यानें माझा आत्मा सतुष्ट झाला.

---

सूळ = क्रूस : वधस्तंभ.

जमीन आणि आकाश यांच्यामध्यें मी लोंबकळत असतां मला पाहण्यासाठीं त्यांनीं आपल्या माना वर केल्या आणि अशा प्रकारें ते मोठे झाले. कारण आजपर्यंत त्यांनी आपल्या माना कधींच उंच केल्या नव्हत्या!

परंतु ते माना वर करुन माझ्याकडे पाहात उभे राहिले असतां त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला, " तूं कशासाठीं हें प्रायाश्चित्त घेत आहेस ? "

दुसऱ्यानें विचारलें, " तूं कोणत्या ध्येयाखातर आपलें बलिदान करीत आहेस ? "

तिसऱ्यानें प्रश्न केला, " या एवढ्या किंमतीमध्यें जगभर पसरून राहणारी कीर्ति आपल्याला विकत घेतां येईल असें तुला वाटतें काय ? "

नंतर चौथा म्हणाला, " बघा तर खरें, तो कसा हंसतोय तें ! इतकी पीडा देणाऱ्यांना क्षमा करणें शक्य आहे काय ? "

यावर उत्तरादाखल मी त्या सर्वांना म्हणालों.

" मी सुळावर हंसत होतों एवढेंच तुम्हीं ध्यानांत ठेवा. मी कसलेंहि प्रायश्चित्त करीत नाहीं अथवा बलिदानहि देत नाहीं, अथवा कीर्तिचीहि लालसा मला नाहीं आणि ज्याबद्दल मी क्षमा करावी असें कांहींच

घडलेलें नाहीं. मी तहानलेला होतों आणि माझें रक्त मला प्यायला द्या अशी मीं तुमच्याकडे याचना केली. कारण, वेडयाची तहान भागवू शकेल अशी त्याच्या स्वतःच्या रक्ताखेरीज दुसरी कोणती वस्तु या जगांत आहे? मी मुका होतों आणि मीं तुमच्याकडे बोलण्यासाठीं जखमांचीं तोंडें मागितलीं. तुमचे दिवस आणि तुमच्या रात्री यांच्या कैदेंत मी पडलों होतों. म्हणून मीं अधिक विशाल दिवस आणि रात्री यांच्यामध्यें प्रवेश करण्यासाठीं एक दरवाजा शोधून काढला.

यापुर्वी सुळावर चढलेले इतर लोक जसे निघून गेले तसा मींहि आतां जातों. आम्ही सुळी जाण्यास कटाळलों आहोंत असें मात्र तुम्ही समजू नका. कारण याहूनहि अधिक विशाल पृथ्वीच्या व आकाशाच्यामध्यें याहूनहि अधिकाधिक मोठ्या जनसमूहानीं आम्हांला सुळावर चढवलेंच पाहिजे.

## खगोलशास्त्रज्ञ

देवळाच्या सावलीत एकटाच बसलेला एक आंधळा गृहस्थ मीं व माझ्या मित्रानें पाहिला माझा मित्र म्हणाला, "तो पहा आपल्या देशातील सर्वात अधिक विद्वान मनुष्य !"

हें ऐकून मी माझ्या मित्राला तेथेंच सोडून त्या आंधळ्या गृहस्थाजवळ गेलो आणि त्याला नमस्कार केला. नंतर आमचें बोलणे सुरू झालें.

थोडया वेळानें मी म्हणालों, "क्षमा करा, मी आपल्याला एक प्रश्न विचारू इच्छितों. आपण केव्हांपासून आंधळे झालांत ?"

"मी जन्मापासूनच आंधळा आहें." त्याने उत्तर दिलें

“ आपण कोणत्या ज्ञानमार्गाचें अनुसरण करीत असतां? (आपण कोणत्या शास्त्राचें अध्ययन केलें आहे?)” मीं विचारलें.

“ मी खगोलशास्त्रज्ञ आहें.” तो उत्तरला.

नंतर आपल्या छातीवर हात ठेवून तो म्हणाला, “या ठिकाणीं असलेल्या सर्व सूर्यांचें, चंद्रांचें नि ताऱ्यांचें निरीक्षण मी करीत असतों.”

## महान अभिलाषा

या ठिकाणीं माझा भाऊ पर्वत आणि माझी बहीण सागरिका ( समुद्र ) या दोघाच्यामध्यें मी बसलों आहें.

या एकांतवासामध्यें आम्हीं तिघे एक आहोंत आणि आम्हांला एकत्र बांधणारें प्रेम सखोल, सामर्थ्यवान नि अद्‌भुत आहे. नव्हे, माझ्या बहिणीच्या सखोलतेहूनहि त्याची खोली अधिक आहे आणि माझ्या भावाच्या शक्तीहूनहि तें अधिक शक्तिमान आहे आणि माझ्या अद्‌भुत वेडापेक्षांहि तें अधिक अद्‌भुत आहे.

पहिल्या अंधुक प्रातःकाळीं आम्हीं एकमेकांना पाहिलें, त्याला आतां अनेक युगें होऊन गेली आणि

आम्हीं कित्येक जगाचा जन्म, विकास व मृत्यु हीं पाहिली असली तरी आम्ही अजूनहि उत्सुक व तरुण आहोंत.

आम्ही उत्सुक व तरुण असलों तरीहि आम्ही एकाकी आहोंत आम्हाला कोणीहि भेटावयास येत नाहीं. आम्ही अर्धवट स्थितींत एकमेकांच्या गळ्यात गळे घालून अखडपणें येथें पडलेले असलों तरी आम्हांला सुख नाहीं. दाबून टाकलेली इच्छा आणि रोखून धर-लेली वासना यांपासून कसचें सुख मिळणार?

माझ्या बहिणीची शय्या उबदार करणारा तो अग्नि-देव कोठून येईल बरें? अन् कोणती जलधारा माझ्या भावाच्या अंतःकरणातील आग विझवील? आणि माझ्या हृदयावर स्वामित्व गाजविणारी ती नारी कोण असेल बरें?

रात्रीच्या निःस्तब्धतेमध्यें माझी बहीण झोपेंत अग्नि-देवाचें अज्ञात नांव गुणगुणत असते आणि माझा भाऊ आपल्या त्या दूरस्थ शीत देवतेला हांक मारीत असतो. पण मी झोपेंत कुणाला साद घालतों हें मात्र मला माहित नाहीं.

माझा भाऊ पर्वत आणि माझी बहिण सागरिका ( जळराशि ) यांच्यामध्यें मी या ठिकाणीं बसलों आहे. आम्ही तिघे एकांतवासामध्यें एक आहोंत आणि आम्हांला एकत्र बांधून ठेवणारें प्रेम सखोल, सामर्थ्यवान नि अद्-भुत आहे.

## एक गवताचें पातें म्हणालें—

पानगळ ऋतूमध्यें* झाडावरून खालीं पडणाऱ्या एका पानाला गवताचें एक पातें म्हणालें, " तू खालीं पडताना किती आवाज करतोस रे! तू माझीं सगळीं उबदार स्वप्नें विस्कटून टाकतोस!"

तें पान क्षुब्ध होऊन म्हणालें, " अरे नीचस्थानीं जन्मणाऱ्या नि नीच स्थानीं राहणाऱ्या! तुला गानविद्येचा गधहि नाहीं. तूं अगदींच चिरचिरा आहेस. तूं आमच्याप्रमाणें उच्च वातावरणांत राहात नाहींस, यामुळें तुला गाण्याचा आवाज कसा ओळखतां येणार?"

---

*पानगळ ऋतु=शिशिर ऋतु=Autumn

इतकें बोलत तें पानगळ ऋतूंतील पान जमिनीवर पडलें आणि झोंपी गेलें. वसंताच्या आगमनाबरोबर तें पुन्हां जागें झालें—आणि आता तें स्वतःच एक गवताचें पातें बनलें होतें.

पुन्हां पानगळ ऋतु आला आणि थंडींतील उबदार झोंप त्या गवताच्या पात्यावर आपला मायेचा हात फिरवू लागली. इतक्यांत त्याच्या डोक्यावरील अनंत आकाशांतून टपटप पानें पडू लागलीं. त्याबरोबर तें पातें स्वतःशीं पुटपुटलें, "ही पानगळ ऋतूतील पानें किती गोंगाट माजवितात ! माझीं सगळीं उबदार स्वप्नें विस्कटून टाकलीं यांनीं !"

## डोळा

एके दिवशी डोळा म्हणाला, " या दऱ्यांच्या पलीकडे निळ्या धुक्याचा बुरखा घेऊन बसलेला तो पर्वत मला दिसत आहे. तें दृश्य सुंदर नाही काय ? "

कानानें हें ऐकलें आणि थोडा वेळ एकाग्रतेनें ऐकून तो म्हणाला, " आहे कुठें तो पर्वत ? मला तर तो मुळींच ऐकूं येत नाही ! "

नतर हात म्हणाला, " मी त्या पर्वताचा अनुभव घेण्याचा नि त्याला स्पर्श करण्याचा प्रयत्न करतों आहें, पण व्यर्थ ! मला मुळींच पर्वत सापडत नाहीं. "

आणि नाक म्हणालें, " पर्वत मुळीं अस्तित्वातच नाहीं; कारण मला तर त्याचा वासच येत नाहीं. "

हें ऐकून डोळा दुसरीकडे पाहूं लागला आणि ते तिघेजण डोळ्याला झालेल्या चमत्कारिक भ्रमासंबधीं आपापसांत बोलूं लागले. ते म्हणाले, “ या डोळ्यामध्यें खात्रीनें कांहींतरी बिघाड झाला आहे.”

## दोन विद्वान

अफकार* नांवाच्या एका प्राचीन नगरांत एके काळीं दोन विद्वान होते. ते दोघे एकमेकांचा द्वेष करीत आणि एकमेकांच्या ज्ञानाला तुच्छ लेखीत. कारण त्यांच्यापैकीं एकजण अनीश्वरवादी–नास्तिक–होता तर दुसरा ईश्वर मानणारा–आस्तिक–होता.

एके दिवशीं बाजार पेठेंत त्या दोघांची गांठ पडली आणि आपापल्या अनुयायासमवेत त्यांनीं ईश्वराच्या अस्तित्वा–नास्तित्वासंबधीं वाद घालण्यास व युक्तिवाद

---

*अफकार हें अरबी फिक्र या शब्दाचें बहुवचन फिक्र म्हणजे चिंतन. अफकार म्हणजे चिंतनें. —अनुवादक.

करण्यास सुरवात केली. अनेक तासपर्यंत शाब्दिक झटापट केल्यानंतर ते आपापल्या घरीं परतले.

त्या दिवशीं संध्याकाळीं नास्तिक महाशय देवळांत गेले व तेथील वेदीसमोर साष्टांग नमस्कार घालून आपल्या उच्छृंखल भूतकाळाबद्दल क्षमा करण्याची देवांना प्रार्थना करूं लागले.

आणि त्याचवेळीं ईश्वराचें अस्तित्व मानणारे दुसरे आस्तिक विद्वान् आपले पवित्र धर्मग्रंथ जाळून टाकीत होते, कारण आतां ते नास्तिक बनले होते.

## जेव्हां माझें दुःख जन्मास आलें

जेव्हा माझें दुःख जन्मास आलें तेव्हां मी मोठ्या काळजीपूर्वक त्याचें संगोपन केलें आणि प्रेमळ नाजुकपणें त्याची निगराणी केली.

इतर सर्व जिवत पदार्थांप्रमाणें माझें दुःखहि लहानाचें मोठें झालें आणि तें सशक्त, सुदर व अद्‌भुत आनदांनीं भरलेलें दिसूं लागलें.

मी आणि माझें दुःख दोघेहि एकमेकांवर प्रेम करीत होतों आणि आमच्या सभोंवतालच्या जगावरहि आमचें प्रेम होतें. कारण दुःखाचें हृदय दयाळु होतें आणि दुःखामुळें माझें हृदयहि दयाळु बनलें होतें.

आणि जेव्हां मी व माझें दुःख दोघे आपापसात बोलत असूं तेव्हां आमच्या दिवसाना पंख फुटत आणि आमच्या रात्री स्वप्नांनीं वेष्टिल्या जात. कारण दुःख हें बोलण्यांत मोठें निपुण होतें आणि मीहि त्याच्यामुळें बोलका झालों होतों.

मी आणि माझें दुःख दोघे मिळून जेव्हां गात असूं तेव्हां शेजारी–पाजारी आपापल्या खिडक्यांत बसून आमचीं गाणीं ऐकत. कारण आमची गाणी समुद्रासारखीं सखोल असत आणि आमचे स्वर अद्‌भुत स्मृतीनीं भरलेले असत.

मी आणि माझें दुःख दोघे मिळून जेव्हा फिरत असू तेव्हा लोक आमच्याकडे स्निग्ध दृष्टीनीं पाहात आणि अत्यंत गोड शब्द कुजबुजत अर्थात् आमच्याकडे हेव्यानें पाहणारे लोकहि होते. कारण माझें दुःख ही एक उदात्त व श्रेष्ठ वस्तु होती; आणि मलाहि त्याच्या सान्निध्याचा अभिमान वाटत असे.

पण इतर सर्व जीवधारी वस्तूप्रमाणें माझें दुःखहि मरून गेलें आणि मनांतल्या मनात चिंतन व विचार करण्यासाठी मी एकटाच उरलों.

आतां मी बोलूं लागतों तेव्हां माझे शब्द जोरानें माझ्या कानांवर आदळतात आणि मी माझीं गाणीं गातों तेव्हां माझे शेजारी तीं ऐकावयास येत नाहींत आणि मी रस्त्यांतून चालतों तेव्हां माझ्याकडे कुणी ढुंकूनहि पाहात नाहीं.

फक्त झोंपेंत मात्र कुणीतरी कींव येऊन उच्चारलेले पुढील शब्द मला ऐकूं येतात. ‘ तो पहा, ज्याचें दुःख मरून गेलें आहे असा तो मनुष्य त्या ठिकाणीं पडला आहे ! ’

## आणि जेव्हां माझा आनंद जन्मास आला

आणि जेव्हा माझा आनद जन्मास आला तेव्हा मी त्याला कडेवर घेऊन गच्चीवर गेलों आणि जोरजोरात ओरडू लागलों, " या हो या, माझ्या शेजाऱ्यापाजाऱ्यानो, इकडे या नि बघा. आज माझ्या उदरीं आनद जन्मास आला आहे. या आणि सूर्य प्रकाशात हसणारी ही हर्षदायक व तु पहा.

परतु माझ्या शेजाऱ्यापैकीं एकहि व्यक्ति माझ्या आनंदाला पाहण्यास आली नाहीं. मला फारच आश्चर्य वाटलें.

त्यानंतर सतत सात महिनेपर्यंत प्रत्येक दिवशी मी घराच्या गच्चीवर उभा राहून माझ्या आनंदाची घोषणा करीत राहिलों पण कोणीहि माझ्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं यामुळे माझा आनंद आणि मी असे एकटेच राहिलों. कोणीहि आमची विचारपूस केली नाही कोणीहि आम्हाला भेटावयास आलें नाही.

यामुळें माझा आत्मा निस्तेज व शिणल्यासारखा दिसू लागला; कारण माझ्या हृदयाखेरीज दुसऱ्या कोणत्याच हृदयानें त्याच्या सौंदर्याचें ग्रहण केलें नाही आणि माझ्याशिवाय दुसऱ्या कोणच्याच ओठांनी त्याच्या ओंठांचें चुंबन घेतलें नाही.

अखेर शेवटी एकाकीपणामुळें माझा आनंद मरून गेला.

आणि आता माझ्या मृत दुःखाची आठवण काढतानाच फक्त मला माझ्या मृत आनंदाची आठवण येते. पण स्मृति हें पानगळ ऋतूंतील एक पान आहे. तें थोडा वेळ वाऱ्यामध्यें गुणगुणतें आणि मग मात्र त्याचा आवाज ऐकूं येत नाहीं.

## पूर्ण जग

हे हरपलेल्या आत्म्याच्या देवा, इतर देवामध्यें हरव-ळेल्या देवा, माझें म्हणणे ऐकून घे

- अमच्यासारख्या वेडया नि भटक्या आत्म्यावर नजर ठेवणाऱ्या हे सुशील प्रारब्ध–देवते, मी काय म्हणतो तें ऐक :

मी सर्वांहून अपूर्ण आहे आणि एका पूर्णावस्थेस पोंचलेल्या मानवसमाजामध्यें मी रहात आहें

मी एक मानवी गोंधळ आहे, गोंधळलेल्या पंचमहाभूतांचा एकत्र केलेला समुदाय आहें, मी पूर्णावस्थेस पोंचलेल्या जगांतून संचार करतों. ज्याचे कायदे परिपूर्ण

आहेत, ज्याची सुव्यवस्था नमुनेदार आहे, ज्याचे विचार सुसंगत आहेत, ज्यांचीं स्वप्नें व्यवस्थितपणें मांडलेलीं आहेत आणि ज्यांच्या आभासात्मक कल्पनाहि नीट नोंदलेल्या व लिहिलेल्या आहेत अशा लोकांमधून मी विचरत असतों.

हे ईश्वरा! त्या लोकांच्या सद्गुणांचें मोजमाप केलें जातें, त्यांच्या पापाचें वजन करण्यात येतें आणि पापाच्या अथवा पुण्याच्या अंधुक संधिप्रकाशांतहि न वावरणाऱ्या अशा अगणित वस्तूंचीहि नोंद करण्यात येऊन सविस्तर यादी बनविण्यात येते.

या ठिकाणी दिवस आणि रात्री यांचें आचारांच्या ऋतूमध्ये विभाजन करण्यात आलेलें आहे आणि निर्दोष काटेकोरपणाच्या नियमाचें त्यांच्यावर राज्य चालतें.

खाणे, पिणे, झोंपणें, आपली नग्नता झांकणें आणि मग ठरलेल्या वेळी थकून जाणें, काम करणें, खेळणें, गाणें, नाचणें आणि घड्याळाचा ठोका पडतांच निपचित पडून राहणें—

एका विशिष्ट पद्धतीने विचार करणें, अमुक इतकीच प्रचीति घेणें आणि पलीकडील क्षितिजावर एक विशिष्ट तारा उगवतांच विचार करणें व अनुभूति घेणें सोडून देणें—

एका स्मिताच्या जोरावर शेजाऱ्याला लुबाडणें, मोठ्या झोंकदारपणे हातवारे करून देणग्या देणें, मोठ्या चातुर्यानें स्तुति करणे, सावधगिरीनें निंदा करणें, एका शब्दाने एखाद्या आत्म्याचा नाश करणें, एका उच्छ्वासानें एखादें शरीर जाळून टाकणे आणि दिवसभराचें काम सपलें की, या सगळ्या भानगडीतून हात धुवून रिकामें होणे—

एका ठराविक चाकोरीतून प्रेम करणें, पूर्वी ठरून गेलेल्या पद्धतीनें आपल्या सर्वोच्च आत्म्याचें मनोरंजन करणें, आपल्याला शोभेल अशा थाटानें देवाची पूजा करणें, मोठ्या कलात्मक रीतीने सैतानाशी कारस्थान करणे आणि मग जणू स्मरणशक्ति मरून गेल्याप्रमाणें साऱ्या गोष्टी विसरून जाणें—

एका विशिष्ट उद्देशानें कल्पना करणें, काही विचार मनात योजून चिंतन करणें, गोडपणान सुखी राहणें, उदात्तपणें दुःख सोसणें आणि उद्या पुन्हा पेला भरता यावा म्हणून तो रिकामा करणें—

या सगळ्या गोष्टी, हे परमेश्वरा! आधीं विचार करून ठरविल्या जातात, दृढ निश्चयानें जन्मास येतात, ततोततपणे त्याचे पालनपोषण करण्यात येते, त्याच्यावर

नियमाचे अधिराज्य असतें, बुद्धि (विवेकशक्ति) त्याचे मार्गदर्शन करते आणि एका नेमून दिलेल्या विधीप्रमाणे त्याना ठार मारून पुरून टाकण्यात येतें. इतकेंच नव्हे तर मानवी आत्म्यामध्यें त्याची जी निःस्तब्ध थडगी असतात त्याच्यावरहि खुणा करून त्याची मोजदाद करण्यात येते.

असे हें पूर्ण जग आहे उत्कृष्टपणाच्या कळसास जाऊन पोंचलेलें व महान् आश्चर्यांनी भरलेलें असे हे जग म्हणजे परमेश्वराच्या बागेतील सर्वात अधिक परिपक्व फळ आणि विश्वाची सर्वोच्च कल्पना आहे.

पण, हे ईश्वरा, मी तर अतृप्त वासनाचे हिरवें कच्चे बीज आहे; ज्याला पूर्वेचाहि शोध घ्यावयाचा नाही अथवा पश्चिमेलाहि जावयाचें नाही असें एक वेडें वादळ आहे आणि जळून खाक झालेल्या एका ग्रहाचा भ्रमात पडलेला तुकडा आहे, तेव्हा मी येथे राहावें तरी का?

हे हरपलेल्या आत्म्याच्या देवा, इतर देवामध्यें हरवून गेलेल्या हे देवा, मी या जगात का आहें?

---